# मंगळागौरी पूजा , व्रत कथा व आरती

## मंगळागौरी व्रत

मंगळागौरी, नववधूने सुखी संसारासाठी करावयाचे पार्वतीचे व्रत आहे.

लग्न झाल्यावर सासरी नववधू पहिल्या श्रावण महिन्यात प्रत्येक मंगळवारी हे मंगळागौरीचे व्रत भक्तिभावाने करते. हे पार्वतीचे व्रत आहे. या दिवशी घरासमोर रांगोळी काढतात, दाराला तोरण बांधतात. कुटुंबातील स्त्रिया, नातेवाईक मैत्रीणी एकत्र जमून देवीची पूजा करून, रात्रभर खेळ खेळतात, गाणी म्हणतात, स्वादिष्ट भोजन करतात. नववधू सुहासिनींना सौभाग्यालंकार वाटते. या समारंभामुळे नववधूला सासरकडील नवीन नातेवाईक, इतरजनांची ओळख होते. या पूजेत सासर माहेरकडील सर्व मंडळी

नातेवाईक, स्त्रिया भाग घेतात.

-------------------------------

## पूजा

॥ पूजासाहित्य ॥

हळद , कुंकू , गुलाल , रांगोळी , फुले , दूर्वा , बेल , तुळशी , उदबत्ती , कापूर , नीरांजन , काडवाती , कापसाची वस्त्रे , विडयाची पाने १२ , सुपार्या २५ , नारळ २ , गूळ , खोबरे , खारका ५ , बदाम ५ , पेरु २ , केळी २ , वासाचे तेल , पंचामृत ( दूध , दही , तूप , मध , साखर ), तीळ , तांदूळ , गहू , मुगाची डाळ , जिरे वगैरे धान्ये व पाच रुपयांची सुटी नाणी .

पत्री : -

( १ ) चमेलीची पाने , ( २ ) मक्याची पाने , ( ३ ) बेलाची पाने , ( ४ ) बोरीची पाने , ( ५ ) धोतर्याची पाने , ( ६ ) तुळशीची पाने , ( ७ ) शमीची पाने , ( ८ )

आघाडयाची पाने , ( ९ ) डोरलीची पाने , ( १० ) कण्हेरीची पाने , ( ११ ) रुईची पाने , ( १२ ) अर्जुनसादडयाची पाने , ( १३ ) विष्णुक्रांतीची पाने , ( १४ ) जाईची पाने , ( १५ ) शेवंतीची पाने , ( १६ ) डाळिंबीची पाने .

## ॥ अथ पूजाप्रारंभः ॥

प्रथम आपल्या इष्ट देवतांना हळदकुंकू वाहून देवापुढे विडा ( विडयाची पाने दोन , त्यावर एक सुपारी ) ठेवून देवाला नमस्कार करावा . गुरुजींना म्हणजे उपाध्यायांना व वडील मंडळींना नमस्कार करुन आसनावर बसावे . नंतर पूजेला सुरुवात करावी .

द्विराचम्य ० पुढे दिलेल्या चोवीस नावांपैकी पहिल्या तीन नावांचा उच्चार करुन प्रत्येक नावाच्या शेवटी संध्येच्या पळीने उजव्या हातावर पाणी घेऊन प्राशन करावे . चौथ्या नावाचा उच्चार करुन संध्येच्या पळीने उजव्या हातावर पाणी घेऊन उदक सोडावे . याप्रमाणे

दोन वेळा करावे .

१ ) केशवाय नमः २ ) नारायणाय नमः ३ ) माधवाय नमः ४ ) गोविंदाय नमः ५ ) विष्णवे नमः ६ ) मधुसूदनाय नमः

७ ) त्रिविक्रमाय नमः ८ ) वामनाय नमः ९ ) श्रीधराय नमः १० ) हृषीकेशाय नमः ११ ) पद्मनाभाय नमः १२ ) दामोदराय नमः

१३ ) संकर्षणाय नमः १४ ) वासुदेवाय नमः १५ ) प्रद्युम्नाय नमः १६ ) अनिरुद्धाय नमः १७ ) पुरुषोत्तमाय नमः १८ ) अधोक्षजाय नमः

१९ ) नारसिंहाय नमः २० ) अच्युताय नमः २१ ) जनार्दनाय नमः २२ ) उपेंद्राय नमः २३ ) हरये नमः २४ ) श्रीकृष्णाय नमः

येथून पुढे ध्यान करावे ते असेः - हातात अक्षता घेऊन दोन्ही हात जोडावे व आपली दृष्टी आपल्या समोरील देवाकडे लावावी .

श्रीमन्महागणाधिपतये नमः । इष्टदेवताभ्यो नमः । कुलदेवताभ्यो नमः । ग्रामदेवताभ्यो नमः ।

स्थानदेवताभ्यो नमः । वास्तुदेवताभ्यो नमः ।
मातापितृभ्यां नमः । श्रीलक्ष्मीनारायणाभ्यां नमः ।
श्रीउमामहेश्वराभ्यां नमः । सर्वेभ्यो देवेभ्यो नमः ।
सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो नमो नमः ॥ निर्विघ्नमस्तु ।
सुमुखश्चैकदंतश्च कपिलो गजकर्णकः । लंबोदरश्च
विकटो विघ्ननाशो गणाधिपः ॥ धूम्रकेतुर्गणाध्यक्षो
भालचंद्रो गजाननः । द्वादशैतानि नामानि यः पठेत्
शृणुयादपि ॥ विद्यारंभे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा ।
संग्रामे संकटे चैव विघ्नस्तस्य न जायते ॥ शुक्लांबरधरं
देवं शशिवर्णं चतुर्भुजम् ॥ प्रसन्नवदनं ध्यायेत्
सर्वविघ्नोपशांतये ॥ सर्वमंगलमांगल्ये शिवे
सर्वार्थसाधिके ॥ शरण्ये त्र्यंबके गौरि नारायणि नमोस्तु
ते ॥ सर्वदा सर्वकार्येषु नास्ति तेषाममंगलम् । येषां
हृदिस्थो भगवान् मंगलायतनं हरिः । तदेव लग्नं सुदिनं
तदेव ताराबलं चंद्रबलं तदेव । विद्याबलं दैवबलं तदेव
लक्ष्मीपते तेंघ्रियुगं स्मरामि ॥ लाभस्तेषां जयस्तेषां
कुतस्तेषां पराजयः ॥ येषामिंदीवरश्यामो हृदयस्थो
जनार्दनः ॥ विनायकं गुरुं भांनुं ब्रह्मविष्णुमहेश्वरान् ॥
सरस्वतीं प्रणौम्यादौ सर्वकार्यार्थसिद्धये ॥
अभीप्सितार्थसिद्ध्यर्थं पूजितो यः सुरासुरैः ॥

सर्वविघ्नहरस्तस्मै गणाधिपतये नमः ॥
सर्वेष्वारब्धकार्येषु त्रयस्त्रिभुवनेश्वरः देवा दिशंतु नः सिद्धिं ब्रह्मेशानजनार्दनाः ॥ श्रीमद्भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य अद्य ब्रह्मणो द्वितीये परार्धे विष्णुपदे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वंतरे कलियुगे प्रथमचरणे भरतवर्षे भरतखंडे जंबुद्वीपे दंडकारण्ये देशे गोदावर्याः दक्षिणे तीरे शालिवाहनशके अमुकनाम संवत्सरे दक्षिणायने वर्षाऋतौ श्रावण मासे अमुक पक्षे अमुक तिथौ अमुक वासरे अमुक दिवसनक्षत्रे अमुक स्थिते वर्तमाने चंद्रे अमुक स्थिते श्रीसूर्ये अमुक स्थिते श्रीदेवगुरौ शेषेषु गृहेषु यथायथं राशिस्थान स्थितेषु सत्सु शुभनामयोगे शुभकरणे एवंगुणविशेषण विशिष्टायां शुभपुण्यतिथौ मम आत्मनः सकलशास्त्र पुराणोक्त फलप्राप्तर्थे श्रीपरमेश्वर प्रीत्यर्थे मम इह जन्मनि जन्मांतरे च अखंडितसौभाग्य पुत्रपौत्रादि अभिवृद्धि धनधान्य दीर्घायुष्यादि सकल सिद्धिद्वारा श्रीमंगलागौरी व्रतांगत्वेन विहितं श्रीशिवमंगलागौरी प्रीत्यर्थं यथाज्ञानेन यथामिलित उपचारद्रव्यैः षोडशोपचार पूजनमहं करिष्ये ॥

( उजव्या हातात पाणी घेऊन ताम्हनात सोडावे . )

तत्रादौ निर्विघ्नतासिद्ध्यर्थं महागणपतिपूजनं कलशघंटापूजनं च करिष्ये ॥

( नंतर तांदुळावर सुपारी ठेवून गणपतीचे ध्यान करावे . )

वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ । निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥

( या मंत्राने गणपतीवर अक्षता वाहाव्या . )

अस्मिन् पूगीफले ऋद्धिबुद्धिसहितं महागणपतिं सांगं सपरिवारं सायुधं सशक्तिकं आवाहयामि ॥ महागणपतिं ध्यायामि ॥ महागणपतये नमः ॥ आसनार्थे अक्षतान् समर्पयामि ॥ महागणपतये नमः पाद्यं समर्पयामि ॥

( या मंत्राने पळीभर पाणी घालावे . )

महागणपतये नमः अर्घ्यं समर्पयामि ॥

( या मंत्राने गंधाक्षतामिश्रित पाणी घालावे . )

महागणपतये नमः आचमनीयं समर्पयामि ॥

( या मंत्राने पळीभर पाणी घालावे . )

महागणपतये नमः स्नानं समर्पयामि ॥

( या मंत्राने देवाला स्नान घालावे .)

महागणपतये नमः सुप्रतिष्ठितमस्तु ॥ महागणपतये नमः वस्त्रोपवस्त्रार्थे कार्पासवस्त्रे समर्पयामि ॥

( या मंत्राने कापसाची दोन वस्त्रे गणपतीला वाहावी . )

महागणपतये नमः यज्ञोपवीतं समर्पयामि ॥

( या मंत्राने यज्ञोपवीत वाहावे . )

महागणपतये नमः विलेपनार्थे चंदनं समर्पयामि ॥

( या मंत्राने गंध लावावे . )

महागणपतये नमः अलंकारार्थे अक्षतान् समर्पयामि ॥ ऋद्धिसिद्धिभ्यां नमः ॥ हरिद्रां कुंकुमं सौभाग्यद्रव्यं समर्पयामि ॥

( या मंत्राने हळदकुंकू वाहावे . )

महागणपतये नमः ॥ सिंदूरं नानापरिमलद्र्व्याणि समर्पयामि ॥

( या मंत्राने शेंदूर व बुक्का अर्पण करावा . )

महागणपतये नमः ॥ पूजार्थे ऋतुकालोद्भव पुष्पाणि दूर्वांकुरांश्च समर्पयामि ॥

( या मंत्राने तांबडी फुले व दूर्वा वाहाव्या . )

महागणपतये नमः ॥ धूपं समर्पयामि ॥

( या मंत्राने उदबत्ती ओवाळावी . )

महागणपतये नमः ॥ दीपं समर्पयामि ॥

( या मंत्राने नीरांजन ओवाळावे . )

महागणपतये नमः ॥ नैवेद्यार्थे गुडखाद्यनैवेद्यं समर्पयामि ॥

( पाण्याने चौकोनी मंडळ काढून त्यावर गूळखोबरे ठेवून त्याचा नैवेद्य गणपतीला समर्पण करावा व पुढील मंत्राने म्हणावे . )

प्राणाय नमः ॥ अपानाय नमः ॥ व्यानाय नमः ॥
उदानाय नमः ॥ समानाय नमः ॥ ब्रह्मणे नमः ॥
नैवेद्यमध्ये प्राशनार्थे पानीयं समर्पयामि ॥

( असे म्हणून ताम्हनात पळीभर पाणी सोडावे . )

प्राणाय नमः हे मंत्र पुन्हा एकदा म्हणावे . नंतर

उत्तरापोशनं समर्पयामि ॥ हस्तप्रक्षालनं समर्पयामि ॥ मुखप्रक्षालनं समर्पयामि ॥

( या मंत्राने तीन वेळा पाणी सोडावे . )

करोद्वर्तनार्थे चंदनं समर्पयामि ॥

( या मंत्राने गणपतीला गंध लावावे . )

मुखवासार्थे पूगीफलतांबूलं सुवर्णनिष्क्रय दक्षिणां समर्पयामि ॥

( या मंत्राने विड्यावर दक्षिणा ठेवून त्यावर पाणी सोडावे . )

महागणपतये नमः ॥ मंत्रपुष्पं समर्पयामि ॥

( गणपतीला फूल वाहावे . नंतर हात जोडून प्रार्थना करावी . )

कार्ये मे सिद्धिमायातु प्रसन्ने त्वयि धातरि ॥ विघ्नानि नाशमायांतु सर्वाणि सुरनायक ॥ अनया विघ्नेश्वरपूजया सकलविघ्नहर्ता महागणपतिः प्रीयताम् ॥

## ॥ कलशपूजा ॥

( नंतर तांब्याची पूजा करावी . )

कलशस्य मुखे विष्णुः कंठे रुद्रः समाश्रितः । मूले तत्र

स्थितो ब्रह्मा मध्ये मातृगणास्मृताः ॥ कुक्षौ तु सागराः सर्वे सप्तद्विपा वसुंधरा । ऋग्वेदोथ यजुर्वेदः सामवेदो ह्यथर्वणः ॥ अंगैश्च सहिताः सर्वे कलशं तु समाश्रिताः ॥ अत्र गायत्रीसावित्री शांतिः पुष्टिकरी तथा । आयांतु देवपूजार्थं दुरितक्षयकारकाः ॥ गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वतिः ॥ नर्मदे सिंधु कावेरि जलेस्मिन् सन्निधिं कुरु । कलशाय नमः ॥ सर्वोपचारार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ॥

( या मंत्राने तांब्याला गंध , अक्षता व फूल - लावावे . )

## ॥ घंटापूजा ॥

( नंतर घंटेची पूजा करावी . )

आगमार्थं तु देवानां गमनार्थं तु रक्षसाम् ॥ कुर्वे घंटारवं तत्र देवताह्वानलक्षणम् ॥१॥

घंटाद्रेव्यै नमः ॥ सर्वोपचारार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ॥

( या मंत्राने घंटेला , गंध , अक्षता व फूल लावावे . )

घंटानादं कुर्यात् ।

( या मंत्राने घंटा वाजवावी . )

अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोपि वा ॥ यः स्मरेत् पुंडरीकाक्षं स बाह्याभ्यंतरः शुचिः पूजाद्रव्याणि संप्रोक्ष्य आत्मानं च प्रोक्षेत् ॥

( या मंत्राने फुलाने पूजेच्या साहित्यावर पाणी शिंपडून नंतर आपल्या अंगावर शिंपडावे . )

********************************

अथ ध्यानम् ॥ कुंकुमापरि लिप्तांगां सर्वाभरणभूषितां । नीलकंठप्रियां गौरीं वंदेहं मंगलाह्वयाम् । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः । ध्यायामि ॥

( या मंत्राने मंगलागौरीवर अक्षता वाहून नमस्कार करावा . )

अत्रागच्छ महादेवि सर्वलोक सुखप्रदे । यावद्व्रतमहं कुर्वे पुत्रपौत्राभि वृद्धये । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः । आवाहनार्थे अक्षतान् समर्पयामि ।

( या मंत्राने अक्षता वाहाव्या . )

रौप्येण चासनं दिव्यं रत्नमाणिक्य शोभितम् । मयानीतं

गृहाण त्वं गौरि कामारिवल्लभे । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः । आसनार्थे अक्षतान् समर्पयामि ॥

( या मंत्राने अक्षता वाहाव्या . )

गंगादिसर्वतीर्थेभ्यो मया प्रार्थनयाहृतम् ।
तोयमेतत्सुत्युखस्पर्शं पाद्यार्थं प्रतिगृह्यताम् ।
श्रीशिवमंगलागौरिभ्यां नमः । पाद्यं समर्पयामि ॥

( या मंत्राने पळीभर पाणी घालावे . )

गंधपुष्पाक्षतेर्युक्तमर्घ्यं संपादितं मया । गृहाण मंगलेगौरि प्रसन्ना भव सर्वदा । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः । अर्घ्यं समर्पयामि ॥

( या मंत्राने गंध , अक्षता व फूलमिश्रित पाणी घालावे . )

कामारिवल्लभे देवि कुर्वाचमनमंबिके । निरंतरमहं वंदे चरणौ तव पार्वति । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः । आचमनीयं समर्पयामि ॥

( या मंत्राने पळीभर पाणी घालावे . )

जान्हवी तोयमानीतं जलं कर्पूरसंयुतम् । स्नापयामि सुरश्रेष्ठे त्वां पुत्रादिफलप्रदाम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः स्नानं समर्पयामि ॥

( या मंत्राने पळीभर पाणी घालावे . )

पंचामृतैः स्नपयिष्ये ॥

( या मंत्राने पळीभर पाणी घेऊन ताम्हनात उदक सोडावे . )

सौरमेय्या महद्दिव्यं पवित्रं पुष्टिवर्धनम् । स्नानार्थं ते मया दत्तं गृहाणेदं नमोस्तु ते ॥ श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः पयःस्नानं समर्पयामि ॥ पयःस्नानांते शुद्धोदकस्नानं समर्पयामि ॥

( या मंत्राने दूध घालावे . नंतर दोन पळया पाणी घालावे . )

सर्वोपचारार्थे अक्षतान् समर्पयामि ॥

( या मंत्राने अक्षता वाहाव्या . )

चंद्रमंडलसंकाशं सर्वदेवप्रियं दधि । स्नानार्थं ते प्रयच्छामि प्रीता भव सुरेश्वरि ॥ श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः । दधिस्नानं समर्पयामि । दधिस्नानांते शुद्धोदकस्नानं समर्पयामि । सर्वोपचारार्थे अक्षतान् समर्पयामि ।

( या मंत्राने दही घालावे , नंतर दोन पळया पाणी घालावे

व अक्षता वाहाव्या . )

घृतकुंभसमायुक्तं घृतयोने घृतप्रिये । घृतभुग्घृतधामासि घृतं स्नानाय गृह्यताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः घृतस्नानं समर्पयामि । घृतस्नानानंतरं शुद्धोदकस्नानं समर्पयामि ॥ सर्वोपचारार्थे अक्षतान् समर्पयामि ॥

( या मंत्राने देवाला तूप घालावे . नंतर दोन पळया पाणी घालावे व अक्षता वाहाव्या . )

सर्वोषधिसमुत्पन्नं पीयूषसद्दशं मधु । स्नानार्थं ते मया दत्तं गृहाण परमेश्वरि । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः मधुस्नानं समर्पयामि । मधुस्नानांते शुद्धोदकस्नानं समर्पयामि । सर्वोपचारार्थे अक्षतान् समर्पयामि ॥

( या मंत्राने मध घालून नंतर दोन पळया पाणी घालावे व अक्षता वाहाव्या . )

इक्षुदंडसमुत्पन्ना रस्या स्निग्धतरा शुभा । शर्करेयं मया दत्ता स्नानार्थं प्रतिगृह्यताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः । शर्करास्नानं समर्पयामि ॥ शर्करास्नानानंतरं शुद्धोदकस्नानं समर्पयामि ॥ सर्वोपचारार्थे अक्षतान् समर्पयामि ॥

( या मंत्राने साखर घालून नंतर दोन पळया पाणी घालावे व अक्षता वाहाव्या . )

मलयाचलसंभूतं चंदनागरुवासितं । तोयमेतत्सुखस्पर्शं स्नानार्थं प्रतिगृह्यताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः । गंधोदकस्नानं समर्पयामि । गंधोदकस्नानानंतर शुद्धोदकस्नानं समर्पयामि ॥

( या मंत्राने पळीभर पाणी घेऊन त्यात गंध घालावे व ते पाणी देवाला घालावे . नंतर दोन पळया पाणी घालावे . नंतर गंधापासून पंचोपचार पूजा करावी . )

श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः विलेपनार्थे चंदनं समर्पयामि ।

( या मंत्राने गंध लावावे . )

अलंकारार्थे अक्षतान् समर्पयामि ।

( या मंत्राने अक्षता वाहाव्या . )

श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः पूजार्थे पुष्पं समर्पयामि ।

( या मंत्राने फुले वाहावी . )

श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः धूपं समर्पयामि ।

( या मंत्राने देवाला उदबत्ती ओवाळावी . )

श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः दीपं समर्पयामि ।

( या मंत्राने नीरांजन ओवाळावे . )

श्रीशिवमंगलागौरी नैवेद्य दाखवावा .

प्राणाय नमः । अपानाय नमः । व्यानाय नमः । उदानाय नमः । समानाय नमः । ब्रह्मणे नमः । नैवेद्यमध्ये प्राशनार्थे पानीयं समर्पयामि ।

( या मंत्राने पळीभर पाणी घेऊन उदक सोडावे . नंतर वरील मंत्राने पुन्हा नैवेद्य दाखवावा . )

नंतर उत्तरापोशनं समर्पयामि । हस्तप्रक्षालनं समर्पयामि । मुखप्रक्षालनं समर्पयामि ।

( या मंत्राने तीन वेळा पळीने पाणी घेऊन उदक सोडावे . )

करोद्वर्तनार्थे चंदनं समर्पयामि ।

( या मंत्राने गंध लावावे . )

मुखवासार्थे पूगीफलंतांबूलं समर्पयामि ।
सुवर्णपुष्पदक्षिणां समर्पयामि ।

( या मंत्राने विडा , दक्षिणा , खारीक , बदाम , केळे वगैरे देवापुढे ठेवून त्यावर पळीभर पाणी घालावे . )

श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः । मंत्रपुष्पं समर्पयामि ।

( या मंत्राने फूल वाहावे , व नमस्कार करावा . )

अनेन कृतपूर्वाराधनेन तेन श्रीशिवमंगलागौर्यो प्रीयेताम् ॥

( या मंत्राने पळीभर पाणी घेऊन उदक सोडावे . )

उत्तरे निर्माल्यं विसृजेत् ।

( या मंत्राने देवावरचे फूल घेऊन त्याचा वास घ्यावा व ते आपल्या डाव्या बाजूस ताम्हनात टाकावे व नंतर खालील मंत्राने देवीवर अभिषेक करावा . )

महिम्नः पारं ते परमविदुषो यद्यसदृशी स्तुतिर्ब्रह्मादी नामपि तदवसन्नास्त्वयि गिरः ॥ अथावाच्चः सर्वः स्वमतिपरिणामावधि गृणन् ममाप्येष स्तोत्रे हर निरपवादः परिकरः ॥१॥

अतीतः पंथानं तव च महिमा वाडमनसयोरत दव्यावृत्त्यायं चकितमभिधत्ते श्रुतिरपि ॥ स कस्य स्तोतव्यः कतिविधगुणः कस्य विषयः पदे त्वर्वाचीने

पतति न मनः कस्य न वचः ॥२॥

मधुस्फीता वाचः परमममृतं निर्मितवतस्तव ब्रह्मन्किं वागपि सुरगुरोर्विस्मय पदम् ॥ मम त्वेतां वाणीं गुणकथनपुण्येन भवतः पुनामीत्यर्थेस्मिन् पुरमथन बुद्धिर्व्यवसिता ॥३॥

तवैश्वर्यं यत्तज्जगदुदय रक्षाप्रलयकृत् त्रयीवस्तु व्यस्तं तिसृषु गुणभिन्नासु तनुषु । अभव्यानामस्मिन्वरद रमणीयामरमणीं विहंतुं व्याक्रोशीं विदधत इहैके जडधियः ॥४॥

किमीहः किंकायः स खलु किमुपायस्त्रिभुवनं किमधारो धाता सृजति किमुपादान इति च ॥ अतक्यैश्वर्ये त्वय्यनवसरदुःस्थो हतधियः कुतर्कोऽयं कांश्चिन्मुखरयति मोहाय जगतः ॥५॥

श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः ॥ महाभिषेकस्नानं समर्पयामि । काश्मीरागुरु कस्तुरी कर्पूरमलयान्वितम् । उद्वर्तनं मया वृतं गृह्यतां परमेश्वरि ॥ श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः मांगलिकस्नानं समर्पयामि ।

( या मंत्राने सुवासिक तेल लावून गरम पाणी देवीला घालावे . )

वस्त्रं च सोमदैवत्यं लज्जायास्तु निवारणम् । मया निवेदितं भक्त्या गृहाण परमेश्वरि । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः । वस्त्रोपवस्त्रे कार्पासवस्त्रं समर्पयामि ।

( या मंत्राने कापसाची वस्त्रे वाहावी . )

नवरत्नादिभिर्बद्धां सौवर्णेन च तंतुभिः । निर्मितां कंचुकी भक्त्या गृहाण परमेश्वरि । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः कंचुकीं समर्पयामि ।

( या मंत्राने चोळीबद्दल अक्षता वाहाव्या . )

कुंकुमागरुकर्पूरं कस्तूरीचंदनं तथा । विलेपनं महादेवि गंधं दास्यामि भक्तितः । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः । विलेपनार्थे चंदनं समर्पयामि ।

( या मंत्राने देवाला गंध लावावे . )

अक्षताश्च सुरश्रेष्ठाः कुंकुमेन विराजिताः । मया निवेदिता भक्त्या गृहाण परमेश्वरि । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः अलंकारार्थे अक्षतान् समर्पयामि ।

( या मंत्राने देवाला अक्षता वाहाव्या . )

हरिद्रास्वर्णवर्णाभा सर्वसौभाग्यदायिनी ।
सर्वालंकारमुख्या हि देवि त्वं प्रतिगृह्यताम् ।

श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः हरिद्रां समर्पयामि ।

( या मंत्राने हळद वाहावी . )

हरिद्राचूर्णसंयुक्तं कुंकुमं कामदायकम् । वस्त्रालंकरणं सर्वं देवि त्वं प्रतिगृह्यताम् । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः । कुंकुमं समर्पयामि ।

( या मंत्राने कुंकू वाहावे . )

कज्जलं दीपसंभूतं स्त्रीणां लोचनभूषणम् । नेत्रयोः सुखदं चैव मया दत्तं प्रगृह्यताम् । श्रीशिवमंगला गौरीभ्यां नमः । कज्जलं समर्पयामि ।

( या मंत्राने देवीला काजळ लावावे . )

उदितारुणसंकाशं जपाकुसुमसन्निभम् । सीमंतभूषणार्थाय सिंदूरं प्रतिगृह्यताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः सिंदुरं समर्पयामि ।

( या मंत्राने देवीला शेंदूर वाहावा . )

नानासुगंधिकं द्रव्यं चूर्णीकृत्य प्रयत्नतः । ददामि ते नमस्तुभ्यं प्रीत्यर्थं प्रतिगृह्यताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः । नानापरिमल द्रव्यं समर्पयामि ॥

( या मंत्राने बुक्का , अष्टगंध , अर्गजा वगैरे द्रव्ये वाहावी .

)

वज्रमाणिक्य वैडूर्यमुक्ता विद्रुममंडितम् । पुष्पराग समायुक्तं भूषण प्रतिगृह्यताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः भूषणादि समर्पयामि॥

( या मंत्रांने भूषणादि सर्व अलंकाराप्रीत्यर्थ अक्षता वाहाव्या . )

माल्यादीनि सुगंधीनि मालत्यादीनि वै प्रभो । मया ह्रतानि पूजार्थं पुष्पणि प्रतिगृह्यताम् । करवीरैर्जातिकुसुमैश्चंपकैर्बकुलैः शुभैः । शतपत्रैश्च कल्हारैरर्चये परमेश्वरि । सेवंतिका बकुल चंपकपाटलाब्जैः पुन्नाग जाति करवीर रसालपुष्पैः । बिल्वप्रवाल तुलसीदल मालतीभिस्त्वां पूजयामि जगदीश्वरि मे प्रसीद । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः पूजार्थे नानाविध पुष्पाणि समर्पयामि॥

( या मंत्राने देवाला नाना प्रकारची फुले व बेल वगैरे वाहावी . )

## ॥ अथांगपूजा ॥

( खालील नावांनी देवीची पायांपासून मस्तकापर्यंत अक्षता अगर फुले वाहून पूजा करावी . )

उमायै नमः पादौ पूजयामि ।

( या मंत्राने पायांवर अक्षता वाहाव्या . ),

गौर्यै नमः जंघे पूजयामि ।

( या मंत्राने जंघांवर ),

पार्वत्यै नमः जानुनी पूजयामि ।

( या मंत्राने गुडघ्यावर ),

जगद्धात्र्यै नमः ऊरु पूजयामि ।

( या मंत्राने मांडीवर ),

जगत्प्रतिष्ठायै नमः कटिं पूजयामि ।

( या मंत्राने कंबरेवर ),

शांतिरुपिण्यै नमः ललाटं पूजयामि ।

( या मंत्राने कपाळावर ),

मंगलदात्र्यै नमः शिरः पूजयामि ।

( या मंत्राने मस्तकावर ),

पुत्रदायिन्यै नमः सर्वांगं पूजयामि ।

( या मंत्राने सर्व शरीराच्या अंगांवर अक्षता वाहाव्या . )

**॥ अथ पत्रपूजा ॥**

अपामार्गस्य पत्रैश्च दूर्वाधत्तुरसंज्ञकैः । दूर्वाषोडशसंख्याकैर्बिल्वपत्राणि पंच च ।

( खालील नावांनी देवीला पत्री वाहावी . )

गौर्यै नम ; मालतीपत्रं समर्पयामि ।

( मोगरीचे पान ),

पार्वत्यै नमः भृंगराजपत्रं समर्पयामि ।

( माक्याचे पान ),

जगद्धात्र्यै नमः बिल्वपत्रं समर्पयामि ।

( बेलाचे पान ),

जगत्प्रभायै नमः बदरीपत्रं समर्पयामि ।

( बोरीचे पान ),

शांतिरुपिण्यै नमः धत्तूरपत्रं समर्पयामि ।

( धोत्र्याचे पान ),

देव्यौ नमः तुलसीपत्रं समर्पयामि ।

( तुळशीचे पान ),

लोकवंद्यायै नमः शमीपत्रं समर्पयामि ।

( शमीचे पान ),

काल्यै नमः अपामार्गपत्रं समर्पयामि ।

( आघाडयाचे पान ),

शिवायै नमः बृहतीपत्रं समर्पयामि ।

( डोरलीचे पान ),

भवान्यै नमः करवीरपत्रं समर्पयामि ।

( कण्हेरीचे पान ),

रुद्राण्यै नमः अर्कपत्रं समर्पयामि ।

( रुईचे पान ),

शर्वाण्यै नमः अर्जुनपत्रं समर्पयामि ।

( अर्जुनसादडयाचे पान ),

मंगलागौर्यै नमः विष्णुक्रांतपत्रं समर्पयामि ।

( विष्णुक्रांताचे पान ),

मंगलदात्र्यै नमः नानाविधपत्राणि समर्पयामि ।

( नाना प्रकारची पत्री ),

नमः शिवाय नमः

( या मंत्राने तीळ , तांदूळ जीरकादि नानाविध धान्ये मुठीने वाहावीत . नंतर बेल वाहावा . )

देवद्रुमरसोदभूतः कृष्णागरुसमन्वितः । आघ्रेयः सर्वदेवानां धूपोऽयं प्रतिगृह्यताम् ।
श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः धूपं समर्पयामि ।

( या मंत्राने धूप दाखवावा .)

त्वं ज्योतिः सर्वदेवानां तेजसां तेज उत्तमम् ।
आत्मज्योतिः परं धाम दीपोऽयं प्रतिगृह्यताम् ।
श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः दीपं समर्पयामि ।

( या मंत्राने दिवा ओवाळावा . )

अन्नं चतुर्विधं स्वादुरसैः षडभिः समन्वितम् । भक्ष्यं

भोज्यसमायुक्तं नैवेद्यं प्रतिगृह्यताम् ।
श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः नैवेद्यार्थे पयोनैवेद्यं समर्पयामि ।

( नंतर पाण्याने चौकोनी मंडळ करुन त्यावर दुधाची वाटी ठेवून त्याचा नैवेद्य खालील मंत्राने दाखववावा . )

प्राणाय नमः अपानाय नमः व्यानाय नमः उदानाय नमः समानाय नमः ब्रह्मणे नमः

( या मंत्रानीं नैवेद्य दाखवून नंतर )

नैवेद्यमध्ये प्राशनार्थे पानीयं समर्पयामि ।

( या मंत्राने पळीभर पाणी देऊन उदक सोडावे . नंतर पुनः प्राणाय नमः इत्यादि मंत्र म्हणून नैवेद्य दाखववावा . )

व नंतर उत्तरापोशनं समर्पयामि । हस्तप्रक्षालनं समर्पयामि । मुखप्रक्षालनं समर्पयामि । करोद्वर्तनार्थे चंदनं समर्पयामि ।

( या मंत्रांनी तीन वेळा उदक सोडून नंतर देवीला गंध लावावे . )

पूगीफलं महद्दिव्यं नागवल्या दलैर्युतम् । कर्पूरैला समायुक्तं तांबूलं प्रतिगृह्यताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां

नमः मुखवासार्थे पूगीफलतांबूलं समर्पयामि । इदं फलं मया देव स्थापितं पुरतस्तव । तेन मे सुफलावाप्ति र्भवेज्जन्मनि जन्मनि । हिरण्यगर्भ गर्भस्थं हेमबीजं विभावसोः । अनंतपुण्यफलदगतः शान्ति प्रयच्छ मे । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः सुवर्णपुष्पदक्षिणां समर्पयामि ।

( या तीन मंत्रांनी देवीला विडा , केळे , पेरु वगैरे फळे व महादक्षिणा ठेवून त्यावर उदक सोडावे . )

चंद्रादित्यौ च धरणिर्विद्युदग्निस्तथैव च । त्वमेव सर्वज्योतींषि आर्तिक्यं प्रतिगृह्यताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः महानीरांजनदीपं कर्पूरार्तिक्यं समर्पयामि ।

( या मंत्राने कापूर , काडवाती वगैरे लावून देवाला ओवाळावे . )

नमो देव्यौ महादेव्यै शिवायै सततं नमः । नमः प्रकृत्यै भद्रायै नियताः प्रणताः स्म ताम् । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः मंत्रपुष्पं समर्पयामि ।

( या मंत्राने फूल वाहावे . )

प्रदक्षिणात्रयं चैव करिष्यामि पदे पदे । पापघ्नं तव

देवेशि दुःखं मे हर सुव्रते । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः प्रदक्षिणां समर्पयामि ।

( या मंत्राने प्रदक्षिणा घालावी . )

साष्टांगोऽयं प्रणामस्ते नमस्कृत्य यथाविधि । त्वद्दास इति मे भक्त्या प्रसीद परमेश्वरि ॥ श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः नमस्कारं समर्पयामि ।

( या मंत्राने नमस्कार करावा . )

श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः गीतं नृत्यं वाद्यं छत्रं चामरं व्यजनं सर्वराजोपचारार्थे अक्षतान् समर्पयामि ।

( या मंत्राने अक्षता वाहाव्या . नंतर हातामध्ये फुले घेऊन हात जोडून देवीची प्रार्थना खालील मंत्रांनी करुन ती फुले अंजलीने देवीला वाहावी . )

आवाहनं न जानामि न जानामि विसर्जनम् । पूजां चैव न जानामि क्षम्यतां परमेश्वरि । अन्यथा शरणं नास्ति त्वमेव शरणं मम । तस्मात्कारुण्यभावेन रक्षस्व परमेश्वरि । गतं पापं गतं दुःखं गतं दारिद्र्यमेव च । आगता सुखसंपत्तिः पुण्याश्च तव दर्शनात् । मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वरि । यत्पूजितं मया देवि परिपूर्णं तदस्तु मे । पुत्रान्देहि धनं देहि सौभाग्यं देहि मंगले । अन्यांश्च

सर्वकामांश्च देहि देवि नमोस्तु ते । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः प्रार्थनां समर्पयामि ।

( या मंत्राने फुले वाहून नमस्कार करावा . )

अद्येत्यापिपूर्वोच्चरितवर्तमान एवंगुणविशेषण विशिष्टायां शुभपुण्यतिथौ मम आत्मनः पुराणोक्त फलप्राप्त्यर्थं पूजासांगता सिद्ध्यर्थं अर्घ्यप्रदानं करिष्ये ।

( नंतर पळीमध्ये पाणी घेऊन त्यात गंध , अक्षता , फूल , पैसा , सुपारी घालून खालील मंत्रांनी तीन अर्घ्य सोडावे . )

सर्वसंपत्प्रदे देवि सर्वकामप्रदायिनि । मंगलागौरि मां पाहि गृहाणार्घ्यं नमोस्तु ते । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः इदमर्घ्यं समर्पयामि ।

( या मंत्राने एक अर्घ्य सोडावे . )

कस्तूरीकुंकुमोपेतं सकर्पूरं सचंदनम् । गंधपुष्पाक्षतैर्युक्तं गृहाणार्घ्यं नमोऽस्तु ते । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः इदमर्घ्यं समर्पयामि ।

( या मंत्राने दुसरे अर्घ्य सोडावे . )

अवैधव्यं च सौभाग्यं देहि त्वं मम सुव्रते । पुत्रान्पौत्रांश्च

सौख्यं च गृहाणार्घ्यं नमोऽस्तु ते । श्रीशिवमंगलागौरीभ्यां नमः इदमर्घ्यं समर्पयामि ॥

( या मंत्राने तिसरे अर्घ्यदान सोडावे . )

यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपःपूजाक्रियादिषु । न्यूनं संपूर्णतां याति सद्यो वंदे तमच्युतम् । अनेन यथाज्ञानेन कृतपूजनेन तेन श्रीशिवमंगलागौर्यो प्रीयेताम् । अद्येत्यादि पूर्वोच्चरित वर्तमान एवंगुणविशेषण विशिष्टायां शुभपुण्यतिथौ मम आत्मनः पुराणोक्त फलप्राप्त्यर्थं श्रीपरमेश्वर प्रीत्यर्थं पूजासांगता सिद्ध्यर्थं ब्राह्मणपूजनं करिष्ये ।

( या मंत्राने पळीभर पाणी घेऊन उदक सोडावे . नंतर खालील मंत्राने आसनापासून ब्राह्मणाची पूजा करावी . )

महाविष्णु स्वरुपिणे ब्राह्मणाय इदमासनं । स्वासनम् । इदं पाद्यम् । सुपाद्यम् । इदमर्घ्यम् अस्त्वर्घ्यम् । इदमाचमनीयम् । अस्त्वाचमनीयम् । गंधाः पांतु । सौमंगल्यं चास्तु । अक्षताः पांतु । आयुष्यमस्तु । पुष्पं पांतु । सौश्रेयमस्तु । तांबूलं पांतु । ऐश्वर्यमस्तु । दक्षिणाः पांतु । बहुदेयं चास्तु । दीर्घमायः श्रेयः शांतिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु । नमोस्त्वनंताय सहस्त्रमूर्तये

सहस्त्रपादाक्षि शिरोरुबाहवे सहस्त्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्त्रकोटी युगधारिणे नमः । सकलाराधनैः स्वर्चिमस्तु । अस्तु सकलाराधनैः स्वर्चितम् ।

( या मंत्रांनी ब्राह्मणाच्या हातावर गंध , अक्षता , फूल , विडा व दक्षिणा देऊन त्यावर पाणी घालावे व मस्तकावर अक्षता वाहून नमस्कार करावा . )

अनेन कर्मणा भगवान् परमेश्वरः प्रीयताम् । ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु । ॥ इति श्रीमंगलागौरीपूजा समाप्ता ॥

---

## मंगलागौरी व्रतकथा

श्रीगणेशाय नमः ॥ युधिष्ठिर उवाच ॥ नंदनंदन गोविंद भवतो बहुलाः कथाः ॥ श्रुता उत्कंठि पुत्रायुःकरं श्रोतुं मनो व्रतम् ॥१॥

श्रीकृष्ण उवाच ॥ अवैधव्यकरं वक्ष्ये व्रतं चारिनिषूदन ॥ श्रृणु त्वं सावधानः सन् कथां वक्ष्ये पुरातनीम् ॥ कुंडिनं

नाम नगरं ख्यातस्तत्र द्विजप्रियः ॥ आसीद्वणिग्धर्मपोलो नाम्ना बहुधनोऽपि सः ॥३॥

सपत्नीको ह्यपुत्रौऽसौ नास्तीति व्याकुलो ह्रदि ॥ तस्य गेहे भस्मलिप्तो देहे रुद्राक्षधारकः ॥४॥

जटिलो भिक्षुको नित्यमागच्छन् प्रियदर्शनः ॥ न स्वीकुर्वंस्तदन्नं स इति दृष्टाऽबलावदत् ॥५॥

श्रीगणेशाय नमः ॥ एकदा युधिष्ठिराने प्रश्न केला की , " नंदनंदना गोविंदा ! आजपर्यंत आपणाकडून मी बहुत कथा ऐकल्या . आता पुत्र व आयुष्य देणारे व्रत श्रवण करण्यासाठी माझे मन अत्यंत उत्कंठित झाले आहे . " ॥१॥

हा प्रश्न ऐकून श्रीकृष्ण सांगतात - " हे शत्रुनाशका , धर्मा ! अवैधकारक व्रताची चित्तवेधक अशी फार पुरातन कथा तुला सांगतो , तू सावधान होऊन ऐक ॥२॥

पूर्वी कुंडिन नावाचे एक नगर होते , तेथे ब्राह्मणावर अत्यंत प्रीती करणारा धर्मपाल या नावाने प्रसिद्ध असा एक मोठा धनवान वैश्य राहत होता . ॥३॥

तो सपत्निक असून पुत्रसंतानरहित असल्यामुळे आपणास पुत्र नाही या योगाने निरंतर अंत:करणात व्याकुल असे . त्याच्या घरी भस्म लावलेला व रुद्राक्षांच्या माळा धारण केलेला ॥४॥

असा एक जटाधारी भिक्षुक ( बैरागी ) नित्य येत असे . त्या बैराग्याचे दर्शन सर्वांना अत्यंत प्रिय असे . तो कधीही धर्मपालाचे अन्न स्वीकारीत नसे . ते पाहून त्याची स्त्री पतीला म्हणाली - ॥५॥

स्वामिन्नयं सदाऽऽयाति भिक्षुको जटिलो गृहे ॥ न स्वीकरोत्यस्मदन्नमिति दृष्टा ममाधिकम् ॥ दु:खं प्रजायते नित्यं श्रुत्वा भार्यां वचोऽब्रवीत् ॥६॥

धर्मपाल उवाच ॥ प्रिये कदाचिद्गुप्ता त्वं ससुवर्णांगणे भव ॥ यदा भिक्षार्थमायाति भिक्षोर्वस्त्रांतरे त्वया ॥ सदा तस्य प्रदेयानि सुवर्णांनि प्रियेऽनघे ॥७॥

अनंतरं तस्य भार्याऽचीकरत्स्वामिनोदितम् ॥ जटिलेन तु सा शप्ताऽपत्यं ते न भविष्यति ॥८॥

श्रुत्वा भिक्शोरिदं वाक्यं दु:खिता तमुवाच ह ॥ स्वामिन् शप्ता त्वया पापाच्छापादुद्धर संप्रति ॥९॥

इत्युक्त्वा तस्य चरणौ ववंदे दीनभाषिणी ॥ जटिल

उवाच ॥ भर्तुः समीपे व्यक्तव्यं त्वया पुत्रि ममाज्ञया ॥१०॥

" अहो स्वामिन् ! एक जटाधारी भिक्षुक नित्य आपल्या घरी येतो , परंतु आपल्या घरचे अन्न घेत नाही , त्यामुळे मला निरंतर वाईट

वाटते . " तिचे म्हणणे ऐकून धर्मपाल भार्येला म्हणाला , ॥६॥

" हे प्रिये ! तू एके दिवशी हातात सुवर्ण घेऊन अंगणात गुप्तरुपाने उभी राहा . आणि तो ज्या वेळी भिक्षेसाठी येतो त्यावेळी हे निष्पापे प्रिये ! तू त्या बैराग्याच्या पदरात सुवर्णादी द्रव्य टाक . ॥७॥

धर्मपालाच्या भार्येने पतीच्या आज्ञेप्रमाणे केले . त्यावेळी , त्या जटाधारी भिक्षूने तिला असा शाप दिला की , ‘ तुला अपत्य होणार नाही ’ ॥८॥

हे त्याचे शापयुक्त भाषाण ऐकून ती अत्यंत दुःखित होत्साती त्या भिक्षूला म्हणाली " अहो स्वामिन् ! आपण मला माझ्या अपराधामुळे शाप दिला खरा , परंतु आता मला क्षमा करुन त्या शापासानू माझा उद्धार करावा . "

॥९॥

अशी प्रार्थना करुन ती दीन भाषण करणारी धर्मपालाची भार्या त्याच्या पायांवर पडली , तेव्हा तो जटिल म्हणाला " हे मुली ! तू माझ्या आज्ञेने आपल्या पतीला सांग की ॥१०॥

नीलवस्त्रः समारुह्य नीलांश्च गच्छ काननम् ॥ खननं तत्र कर्तव्यं यत्राश्वस्ते स्खलिष्यति ॥११॥

रम्यं पक्षिभिरायुक्तं मृगसंघद्रुमाकुलम् ॥ सुवर्णरचितं रत्नमाणिक्यादिविभूषितम् ॥१२॥

नानापुष्पैः समायुक्तं दृश्यं देवालयं ततः ॥ वर्तते तन्न भवती भवानी भक्तवत्सला ॥१३॥

आराधय त्वं मनसा यथाविध्युद्धरिष्यति ॥ त्वां भवानीति वचनं श्रुत्वा भिक्षोः सुखप्रदम् ॥१४॥

ववंदे तस्य चरणौ पुनःपुनरुवाच ह ॥ तदैव काले जटिलोऽप्यंतर्भूतो बभूव सः ॥१५॥

तुम्ही निळी वस्त्रे परिधान करुन निळया घोडयावर बसून अरण्यात जावे आणि जेथे आपला घोडा अडखळेल तेथे खणावे ॥११॥

म्हणजे तेथे अत्यंत रमणीय , सभोवती , पक्ष्यांनी युक्त , मृगसमुदायाने व वृक्षांनी व्याप्त , सुवर्णाने बांधलेले , रत्ने व माणके इत्यादीकांनी अत्यंत शोभायमान , ॥१२॥

अनेक प्रकारच्या पुष्पांनी युक्त असे देवालय दृष्टिगोचर होईल . त्या मंदिरात भक्तांवर प्रेम करणारी पूज्य जगदंबा भवानी आहे . ॥१३॥

तिचे अंतःकरणपूर्वक यथाविधी आराधन कर , ती भवानी तुला उद्धरील . " हे भिक्षूचे आशादायक भाषण ऐकून , ॥१४॥

त्याचे चरण वारंवार वंदून प्रार्थना करु लागली . पण तो जटिल तात्काळ गुप्त झाला . ॥१५॥

साऽवदत्पतिमत्रैहि श्रृणु भिक्षूक्तमादरात् ॥
यथोक्तमवदभर्तातच्छत्वा वाक्यमब्रवीत् ॥१६॥

नीलवस्त्रः समारुह्य नीलाश्वं प्रस्थितो वनम् ॥
गच्छन्नानाविधान्वृक्षान् पथि पश्यन् भयाकुलः ॥
ददर्शासौ तडागं च बाहुल्येन विराजितम् ॥१८॥

रक्तनीलोत्पलैश्च - क्रवाकद्वंद्वैश्च राजितम् ॥ स्नानं चकार

तत्रासौ तर्पणाद्यपि भूरिशः ॥१९॥

पुनरश्वं समारुह्य जगाम गहनं वनम् ॥ स्खलितं वाजिनं पश्यन्नश्वादुत्तीर्य तत्क्षणम् ॥२०॥

तेव्हा ती पतीला म्हणाली , " अहो प्राणनाथ ! जरा इकडे या आणि त्या भिक्षूने केलेले भाषण आदरपूर्वक श्रवण करा . " असे म्हणताच पती जवळ आला , तेव्हा तिने त्यास तो भिक्षू जसे बोलला होता , त्याप्रमाणे सर्व सांगितले . ते ऐकून तो तिचा पती धर्मपाल बरे आहे , असे म्हणून ॥१६॥

स्वतः निळी वस्त्रे परिधान करुन , निळया घोडयावर बसून वनात गेला ; तो जाताना मार्गांत अनेक प्रकारचे वृक्ष वगैरे पाहून भयाने व्याकूळ झाला . ॥१७॥

तसेच नाना प्रकारचे हिंस्त्र पशू , सिंह व सर्प यांस मार्गात पाहून भयभीत झाला . पुढे अनेक प्रकारे शोभायमान असे सरोवर त्याने पाहिले ॥१८॥

ते असे की , लाल व कृष्णवर्णाच्या कमलांनी व च्रकवाक पक्ष्यांच्या जोडप्यांनी शोभणारे फार रमणीय होते . त्या सरोवरात धर्मपालाने स्नान करुन

पितृतर्पणादी कर्मही केले ॥१९॥

आणि पुन्हाः तो अश्वावर बसून गहन अरण्यात गेला . आणि ज्या ठिकाणी घोडा अडखळलेला पाहिला तेथे तो अश्वावरुन खाली उतरुन ॥२०॥

चखान पृथिवीं तत्र यावद्देवालयं गतः ॥ ददर्श च महास्थूलं देवालयमसौ ततः ॥२१॥

रत्नैर्मुक्ताफलैश्चैव माणिक्यैश्चापि सर्वतः ॥ पूजयामास जटिलं वाक्यं स्मृत्वातिविस्मितः ॥२२॥

सुवर्णयुक्तवस्त्राणि चंदनान्यक्षतान्शुभान् ॥ चंपकादीनि पुष्पाणि धूपदीपं विशेषतः ॥२३॥

नानापक्वान्नसंयुक्तं रसैः षड्भिः समान्वितम् ॥ नानाशाकैः समाक्रांतं सदुग्धघृतशर्करम् ॥२४॥

नैवेद्यं कुरशुद्ध्यर्थं चंदनं मलयाद्रिजम् ॥ संपाद्य तुष्टह्रदयः - फलतांबूलदक्षिणा ॥२५॥

त्या जागी देवालय लागेतोपर्यंत भूमी खणू लागला . खणता खणता तेथे मोठे विशाल देवालय त्याने पाहिले . ॥२१॥

रत्ने , मौक्तिके व माणिके यांनी सर्वत्र मढविलेले ते

देवालय पाहून व भिक्षूचे वाक्य स्मरुन तो अत्यंत विस्मय पावला . ॥२२॥

नंतर भरजरी वस्त्रे , अनेक प्रकारची सुगंधी द्रव्ये , उत्तम अक्षता , चंपकादी पुष्पे , विशेषे करुन धूप , दीप ॥२३॥

तसेच अनेक उत्तम पक्कान्नांनी व षड्रसांनी संपन्न , नाना प्रकारच्या भाज्या व चटण्या , कोशिंबिरी यांनी युक्त , दूध , तूप , साखर सहीत असा नैवेद्य ॥२४॥

आणि हस्तप्रक्षालनार्थ मलयाचलावर उप्तन्न झालेले चंदन , नानाप्रकारची फळे , तांबूल व दक्षिणा अशी सर्व पूजासामग्री तयार करुन मनात संतोष पावला . ॥२५॥

जजाप मंत्रान् गुप्तोऽसौ सगुणध्यानपूर्वकम् ॥ देवी भक्तां गृहादेत्य लोभयामास सादरम् ॥२६॥

प्रसन्नाऽवददत्रेयं पूजा संपादिता कथम् ॥ येन संपादिता तस्मै ददामि वरमद्भुतम् ॥२७॥

इति श्रुत्वा धर्मपालो देव्यग्ने प्रांजलिः स्थितः ॥ भगवत्युवाच ॥ धर्मपाल त्वया सम्यक् पूजा संपादितानघ ॥२८॥

वरं याचय मद्भक्त ददामि बहुलं धनम् ॥२९॥

धर्मपाल उवाच ॥ बहुला धनसंपत्तिर्वर्तते त्वत्प्रसादतः ॥३०॥

आणि देवीच्या सगुण स्वरुपाचे ध्यान मनात आणून तो गुप्त रीतीने एका बाजूस बसून देवीमंत्राचा जप करु लागला . तोच देवी गर्भगृहातून येऊन भक्ताने मोठया आदराने केलेली पूजा पाहताच त्या पूजेचा स्वीकार करण्याविषयी लुब्ध झाली ॥२६॥

आणि प्रसन्न होऊन म्हणाली की , " या असल्या अगम्य स्थळी ही पूजा संपादन झाली तरी कशी ? ज्याने ही पूजा सिद्ध केली असेल त्याला मी अदभुत वर देईन . " ॥२७॥

हे भाषण ऐकताच तो धर्मपाल देवीपुढे हात जोडून उभा राहिला . त्यावेळी ती भगवती देवी म्हणाली - " हे निष्पापा धर्मपाल ! तू माझी सर्वोत्कृष्ट रीतीने पूजा केलीस . ॥२८॥

हे माझ्या भक्ता ! वर माग . मी तुला पुष्कळ धन देते . " धर्मपाल म्हणाला - " हे जगज्जननी ! तुझ्या कृपाप्रसादाने माझ्याजवळ धनसंपत्ती खूप आहे . ॥२९॥

आता मी केवळ पितरांना तारणारे असे उत्तम अपत्य प्राप्त व्हावे असे इच्छितो . माझ्या घरी नित्य एक भिक्षुक येतो , परंतु मी पुत्ररहित असल्यामुळे तो माझे अन्न ग्रहण करीत नाही . ॥३०॥

अपत्यं प्राप्तुमिच्छामि पितृणां तारकं शुभम् ॥ आयाति भिक्षुको गेहे गृह्णाति न मदन्नकम् ॥३१॥

तेन मे बहुलं दुःखं सभार्यस्योपजायते ॥ इति दीनवचः श्रुत्वा देवी वचनमब्रवीत् ॥ देव्युवाच ॥ धर्मपालक तेऽदृष्टेऽपत्यं नास्ति सुखप्रदम् ॥ तथापि किं याचयसि कन्यां विगतभर्तृकाम् ॥३२॥

पुत्रमल्पायुषं वाथाप्यंधं दीर्घायुषं सुतम् ॥ धर्मपाल उवाच ॥ पुत्रमल्पायुषं देहि तावता कृतकृत्यताम् ॥३३॥

प्राप्नोमि चोद्धरिष्यामि पितरो मम घोरगाः ॥ देव्युवाच ॥ मत्पार्श्वे वर्तमानस्य नाभावरुह्य शुंडिनः ॥३४॥

तत्पार्श्ववर्चितूतस्य गृहीत्वा फलमद्भुतम् ॥ पत्न्यै देयं ततः पुत्रो भविष्यति न संशयः ॥३५॥

त्यामुळे भार्येसहवर्तमान मला निरंतर फार दुःख होते , " असे धर्मपालाचे दीन भाषण ऐकून देवी म्हणाली ,
॥३१॥

" हे धर्मपाला ! तुझ्या नशिबात सुखदायक अपत्य नाही . परंतु तुझे मागणे तरी काय ? वैधव्य प्राप्त होणारी कन्या मागतोस ? ॥३२॥

की अल्पायुषी पुत्र पाहिजे ? अथवा दीर्घायु असून अंध असा पुत्र झाला तरी चालेल ? " हे ऐकून धर्मपाल म्हणाला - " हे माते ! अल्पायुषी पण चांगला शहाणा पुत्र दे ; म्हणजे तेवढ्यानेच मला कृतकृत्यता वाटेल ॥३३॥

आणि माझे पितर घोर नरकात जात आहेत , त्यांचा उद्धार होईल . " हे त्याचे भाषण ऐकून देवी म्हणाली - " माझ्या पार्श्वभागी असणार्या गणपतीच्या नाभीवर चढून ॥३४॥

त्या गणपतीच्या बाजूस आंब्याच्या वृक्षाने अदभुत फळ घेऊन ते तू आपल्या भार्येला दे ; म्हणजे त्यापासून पुत्र होईल यात संशय नाही . " ॥३५॥

इति देवीवचः श्रुत्वा गत्वा तत्पार्श्व एव च ॥ नाभिं गजमुखस्याथारुह्य जग्राह्य मोहतः ॥ फलान्युत्तीर्य च ततः फलमेकं ददर्श सः ॥३६॥

एवं पुनः पुनः कुर्वन् फलमेकं ददर्श सः ॥ क्षुब्धो गणपतिश्चाथ धर्मपालाय शप्तवान् ॥३७॥

षोडशे वत्सरे प्राप्ते अहिः पुत्रं दशिष्यति ॥ धर्मपालः फलं सम्यक् वस्त्रे बद्धवाऽगमद्गृहम् ॥३८॥

फलं पत्न्यै ददौ सापि भक्षयित्वा पतिव्रता ॥ गर्भं सा धारयामास पत्यासह सुसंगता ॥३९॥

संपूर्णे नवमे मासे प्रासूत सुतमुत्तमम् ॥ जातकर्म चकारास्य पिता संतुष्टमानसः ॥४०॥

असे देवीचे भाषण ऐकल्यावर तिच्या पार्श्वभागी जाऊन गणपतीच्या नाभीवर चढून देवीच्या आज्ञेप्रमाणे एक फळ घ्यावयाचे ते सोडून त्याने मोहाने खूप फळे घेतली , परंतु खाली उतरुन पाहतो तो एकच फळ त्याने आपणाजवळ पाहिले . ॥३६॥

अशी पुनः पुन्हा पुष्कळ फळे घेऊन खाली आला , परंतु प्रत्येक वेळी पाहतो तो एकच फळ आपणापाशी आहे असे त्याच्या दृष्टीस पडे . नंतर वारंवर चढण्याच्या त्रासाने गणपती क्षुब्ध होऊन त्याने धर्मपालास शाप दिला की , ॥३७॥

" तुझ्या पुत्राला सोळावे वर्ष लागले की सर्पदंश करील . " हे ऐकून त्या काली धर्मपाल ते फळ उत्तम प्रकारे वस्त्रात बांधून घरी आला ॥३८॥

आणि ते फळ भार्येला दिले व त्या महापतिव्रतेने ते भक्षण केले . पुढे थोडया कालात ती स्त्री पतीशी रममाण होऊन गर्भ धारण करती झाली . ॥३९॥

पुढे क्रमाक्रमाने नऊ महिने पूर्ण झाल्यावर तिने उत्तम पुत्राला जन्म दिला , त्या वेळी त्याचा पिता धर्मपाल मनात मोठा संतोष पावून त्याने त्या पुत्राचे जातकर्म केले . ॥४०॥

षष्ठीपूजां चकारास्य षष्ठे तु दिवसे ततः ॥ द्वादशेऽहनि संप्राप्ते शिवानाम्ना जुहाव तम् ॥४१॥

षष्ठे मासि चाकारासावन्नप्रशनमद्भुतम् ॥ तृतीये वत्सरे चूडामष्टमेऽब्दे ह्यनुत्तमम् ॥ कृत्वोपनयनं पार्थ विप्रोऽभूत्तुष्ट्मानसः ॥४२॥

दशमे वत्सरे प्राप्तेऽब्रवीद्भार्या पतिव्रता ॥ भार्योवाच ॥ बालकस्य विवाहोऽपि कर्तव्यः सुमुहूर्तके ॥४३॥

धर्मपाल उवाच ॥ मया संकल्पितं काश्यां गमनं

बालकस्य तत् ॥ कृत्वा समायातु ततो विवाहोऽस्त भविष्यति ॥४४॥

पुत्रोऽसौ प्रेषितस्तेन शालकेन समन्वितः ॥ वाराणस्यां प्रस्थितोऽसौ गृहीत्वा बहुल धनम् ॥४५॥

सहाव्या दिवशी षष्ठीपूजन केले . नंतर बारावा दिवस आला तेव्हा त्याचे शिव असे नामकरण करुन त्यास शिव या नावाने हाक मारु लागला . ॥४१॥

सहाव्या महिन्यात त्याने पुत्राला अदभुत आश्चर्यकारक संस्कारयुक्त अन्नप्राशन करविले . तिसरे वर्षी चूडाकर्म ( चौल ) केले . हे धर्मा ! आठव्या वर्षी मुलाचे सर्वोत्कृष्ट रीतीने उपनयन ( मुंज ) केले आणि तो धर्मपाल अंतःकरणात संतोष पावला ॥४२॥

पुढे त्या मुलाला दहावे वर्ष लागले असता त्याची महापतिव्रता स्त्री पतीला म्हणाली - " हे नाथ ! सुमुहूर्तावर या बालकाचा विवाहही करावा " ॥४३॥

त्या वेळी धर्मपाल म्हणाला की , " मी पूर्वी या बालकास काशीयात्रा करुन आणण्याच्या संकल्प केला आहे . मुलगा ती यात्रा करुन येऊ दे व नंतर त्याचा विवाह करु .

" ॥४४॥

असे बोलून धर्मपालाने त्या मुलाला शालका ( मेहुण्या ) समागमे यात्रेला पाठविले . तेव्हा तो शालक विपुल धन घेऊन काशीयात्रेला निघाला . ॥४५॥

कुर्वंतौ पथि सद्धर्मं प्रतिष्ठापुरमीयतुः ॥ क्रीडंत्यः कन्यका दृष्टास्तत्र देशे मनोरमे ॥४६॥

तासां समाजे गौरांगी सुशीला नाम कन्यका ॥ तया सह सखी काचिच्चकार कलहं भृशम् ॥४७॥

गालनं च ददौ तस्यै रंडेऽभाग्ये मुहुर्मुहुः ॥ सुशीलोवाच ॥ सखि त्वया गालनं मे व्यर्थं दत्तं शुभानने ॥४८॥

जनन्या मे मानवत्याश्चास्ति गौरीव्रतं शुभम् ॥ तस्य प्रसादात्सकलाः संबंधिन्यः प्रियाः स्त्रियः ॥४९॥

आजन्माऽविधवा जाताः किं पुनः कन्यका ध्रुवम् ॥ वक्ष्ये तस्य प्रभावं च व्रतराजस्य भामिनी ॥५०॥

पुढे ते दोघे मामा - भाचे मार्गात नाना प्रकारे दान - धर्म करीत प्रतिष्ठानपुरास ( पैठणास ) आले . तेथे एका रमणीय स्थली काही कन्या क्रीडा करीत आहेत असे त्यांनी पाहिले . ॥४६॥

त्या कन्यांच्या मेळाव्यात गौरवर्ण अशी सुशीला नावाची एक कन्या होती . तिच्या एका मैत्रिणीने तिच्याशी मोठे भांडण केले ॥४७॥

आणि हे अभागिनी , विधवे ! अशा शिव्या पुनः पुन्हा सुशीलेला दिल्या ; मग सुशीला म्हणाली - " हे शुभमुखी सखी ! तू मला व्यर्थ अभद्र शिव्या दिल्यास ॥४८॥

कारण माझ्या मानवती नावाच्या मातुश्रीला शुभकारक मंगलागौरीचे व्रत आहे . त्या व्रताच्या प्रभावाने आमच्या आप्तसंबंधी सर्व प्रिय स्त्रिया ॥४९॥

आजन्मपर्यंत सौभाग्यवतीच राहिल्या तेव्हा त्या मानवतीची मी प्रत्यक्ष कन्या असल्यामुळे आजन्म सौभाग्यवतीच राहीन , याबद्दल संशय नाही . हे सुंदरी ! त्या श्रेष्ठ मंगलागौरी व्रताचा किंचित् प्रताप सांगते . ॥५०॥

पूजने धूपदीपोऽयं यत्र तत्र सुखं भवेत् ॥ इति श्रुत्वा ततो वाक्यं विस्मयोत्फु ल्लोचनः ॥५१॥

मातुलश्चिंतयामास बालकस्य प्रियं ततः ॥ शतं जीवो भवेदेष एतद्धस्ताक्षता यदि ॥ पतंत्यमुष्य शिरसि इति भाव्य पुनः पुनः ॥५२॥

सुशीलामेव पश्यन्स विस्मयोत्फुल्ल्लोचनः ॥ सुशीला प्रस्थिता गेहे तदनुप्रस्थितावुभौ ॥५३॥

स्वगृहं प्राप गौरांगी निकटे तद्दहस्य तौ ॥ सत्तडागे रम्यदेशे वासं चक्रतुरादरात् ॥५४॥

विवाहकाले संप्राप्ते सुशीलाजनको हरिः ॥ विवाहोद्योगवान् जातो विचचार हरं वरम् ॥५५॥

तो असा की , जेथे मंगलागौरीच्या पूजनांतही धूपदीप लावले जातात , त्या स्थळी तेवढयानेच सर्वत्र सुख लाभते , " असे त्या कन्येचे भाषण ऐकून विस्मयाने प्रफुल्लित नेत्र झालेला ॥५१॥

त्या बालकाचा मामा त्या भाच्याचे कल्याण होण्याविषयी चिंतन करु लागला . तो विचार करु लागला की , या मुलीच्या हातच्या अक्षता जर या बालकाच्या मस्तकावर पडतील , तर हा मुलगा खरोखर शंभर वर्षे जगेल . असे वारंवार मनात आणून ॥५२॥

तो मातुल विस्मयाने प्रफुल्लित नयन होऊन त्या सुशीला नामक कन्येकडेच पाहू लागला आणि सुशीला स्वगृही जाण्यासाठी निघाली तो तिच्या मागे ते मामा - भाचे निघाले . ॥५३॥

नंतर ती गौरांगी सुशीला आपल्या घरी गेली , आणि मामा - भाचे तिच्या घराजवळ उत्तम तळयावरील रमणीय प्रदेशात चांगला आश्रम पाहून राहिले . ॥५४॥

पुढे सुशीलेचा विवाहकाल करु लागला आणि जवळच राहणारा हर नावाचा एक वर त्याने पाहिला . ॥५५॥

असमर्थं हरं दृष्टा तन्मातापितरावभौ ॥ ययाचतुः शिवं बद्धांजली विनययुक्तकौ ॥५६॥

वरपितरावूचतुः ॥ उपस्थितो विवाहो नौ पुत्रस्य शुभया हरेः ॥ सुशीलया कन्ययाऽयमसमर्थश्च दृश्यते ॥५७॥

अतो देयः शिवः श्रीमान्      लग्नकाले त्वया विभो ॥ लग्नं भविष्यति ततो देयोऽस्माभिः शिवस्तव ॥५८॥

मातुल उवाच ॥ अवश्यं लग्नकालेऽसौ शिवो ग्राह्यः प्रियंवद ॥ ततो मुहूर्ते संप्राप्ते विवाहकमरोच्छिवः ॥५९॥

तत्रैव शयनं चक्रे ससुशीलः प्रियंवदः ॥ स्वप्ने सा मंगलागौरी मातृरुपेण भास्वता ॥ सुशीलामवदत्साध्वी हितं वचनमेव च ॥६०॥

त्यावेळी हर लग्न करण्याला अशक्त आहे असे पाहून

त्या हराचे मातापितर उभयता मोठया नम्रतेने हात जोडून त्या यात्रेकरिता आलेल्या मामाजवळ येऊन हा तुमचा शिव नावाचा भाचा आम्हाला द्या , अशी याचना करु लागले . ॥५६॥

ती अशी की , येथे हरीच्या सुशीला नामक मुलीशी आमच्या मुलाचा विवाह करण्याचे ठरविले आहे , परंतु आमचा मुलगा तर यावेळी लग्नाला अयोग्य दिसतो ; ॥५७॥

याकरिता हे उदार मामा ! तुम्ही आपला शरीरसंपत्तिमान् शिव नावाचा भाचा लग्नसमयी जरासा आम्हाला द्या . लग्नोत्साह उरकल्यावर आम्ही तुमचा शिव तुम्हाला देऊ . ॥५८॥

हे ऐकून मातुल म्हणतो - " महाराज ! हा मधुर भाषण करणारा शिव तुम्ही लग्नकाली अवश्य घ्यावा . " असा करार झाल्यावर पुढे विवाहमुहूर्त प्राप्त झाला असता सुमुहूर्ती त्या सुशीलेचे पाणिग्रहण शिवाने केले ॥५९॥

आणि त्या विवाहाच्या दिवशी रात्री सुशीलेसह मधुरभाषी अशा शिवाने तेथेच निद्रा केली . त्या रात्री ती साध्वी तेजःपुंज मंगलागौरी देवी सुशीलेच्या मातुश्रीच्या

रुपाने येऊन सुशीलेला हितकारक वचन बोलली .
॥६०॥

गौर्युवाच ॥ सुशीले तव गौरांगि भर्तुर्दंशार्थमागतः ॥
महान् भुजंग उत्तिष्ठ दुग्धं स्थापय तत्पुरः ॥६१॥

घटं च स्थापयाशु त्वं तन्मध्ये स गमिष्यति ॥
कूर्पासमंगान्निष्कास्य बंधनीयस्त्वया घटः ॥६२॥

प्रातरुत्थाय देहि त्वं मात्रे वायनकं शुभम् ॥ इति
गौरीवचः श्रुत्वा सुशीला क्षणमुत्थिता ॥६३॥

ददर्शाग्रे निःश्वसंतं कृष्णसर्पं महाभयम् ॥ ततश्चकार
गौर्युक्तं प्रवृत्ता निद्रितुं ततः ॥६४॥

उवाच वर आसन्नः क्षुल्लग्ना महती मम ॥ भक्षणायाशु
देहि त्वं लडकादिकमुत्तमम् ॥६५॥

ते असे की , गौरी म्हणते , " हे गौरांगी सुशीले ! तुझ्या
पतीला दंश करण्यासाठी मोठा भयंकर भुजंग आला
आहे , याकरिता लवकर ऊठ , आणि त्या सर्पापुढे दूध
ठेव ॥६१॥

आणि त्या दुधाजवळ लागलीच एक कलश ठेव म्हणजे
तो भुजंग दूध प्राशन करुन त्या कलशात जाईल , नंतर

तू आपल्या अंगातील चोळी काढून त्या चोळीने त्या कलशाच्या तोंडाला बांध ॥६२॥ आणि प्रातःकाळी उठून तू तो तोंड बांधलेला उत्तम कलश आपल्या आईला वायन दे . " गौरीचे हे भाषण ऐकून सुशीला तत्क्षणी उठली . ॥६३॥

तो पुढे फुत्कार टाकीत आहे , असा महाभयंकर भला मोठा कृष्णसर्प सुशीलेने पाहिला . तेव्हा गौरीच्या आज्ञेप्रमाणे सर्व तिने केले व ती पुन्हाः निजली . नंतर ॥६४॥

तिचा पती शिव जवळच झोपलेला होता तो जागा होऊन म्हणाला की , " मला फार भूक लागली आहे तरी मला खाण्यासाठी लाडू वगैरे काही उत्तम पदार्थ दे . " ॥६५॥

श्रुत्वेति वाक्यं पात्रे सा ददौ लड्डुकमुत्तमम् ॥ भक्षयित्वा शिवो हैमे तस्मिन्पात्रेऽली - यकम् ॥६६॥

दत्त्वा तत्स्थापयामास स्थले गुप्ते शुभाननः ॥ सुखेन शयनं चक्रे पृथिव्यां सर्वकोविदः ॥६७॥

ततः प्रभातसमये शिव आगाद्रगृ स्वकम् ॥ स्नानशुद्धा सुशीला सा मात्रे वायनकं ददौ ॥६८॥

माता दर्दश तन्मध्ये मुक्ताहारमनुत्तमम् ॥ ददौ प्रियायै कन्यायै सहसातुष्टमानसा ॥६९॥

क्रीडाकाले सुसंप्राप्ते हर मंडपे ॥ आदेशयत्सुशीलां ता क्रीडार्थं जननी ततः ॥७०॥

असे पतीचे भाषण ऐकून सुशीलेने उत्तम लाडू सुवर्णपात्रात घालून दिला . तो खाऊन सुवर्णपात्रात त्याने आपली अंगठी घालून सुशीलेला दिली . ॥६६॥

आणि सुशीलेने दिलेले ते सुवर्णपात्र शिवाने खुणेसाठी म्हणून आपल्यापाशी गुप्तस्थानी ठेविले . आणि तो सर्व कर्मांत चतुर शिव त्या स्थळीच सुखाने निजला . ॥६७॥

पुढे प्रातःकाल होताच शिव आपले बिर्हाडी आला . इकडे सुशीलेने देवीच्या आज्ञेप्रमाणे स्नान करुन शुचिभूर्त होऊन आपल्या मातेला रात्री तोंड बांधलेला व आत सर्प असलेला , अशा कलशाचे वायन दिले ॥६८॥

तो त्या कलशात सर्पाऐवजी सर्वोत्कृष्ट मोत्यांचा हार त्या मातेच्या दृष्टीस पडला . तत्काल ती मनात अत्यंत संतुष्ट झाली व तिने तो हार आपल्या आवडत्या सुशीलेला दिला . ॥६९॥

नंतर दुसर्या दिवशी विवाह कौतुकाने वधुवरे खेळविण्याची वेळ येताच पूर्वी ज्या मुलास ती सुशीला देण्याचा संकेत केला होता व नकळत त्याच्याऐवजी शिवाशी लग्न लावले , तो हर नावाचा मुलगा सुशीलेच्या मंडपात आला . तो येताच माता त्या सुशीलेला क्रीडार्थ बोलावू लागली . सुशीलेने पाहिले तो हा आपला पाणिग्रहणकर्ता वर नव्हे . तेव्हा ती आपल्या मातेला म्हणाली , ॥७०॥

सुशीलावोच ॥ नायं वरो मे जननि येन पाणिग्रहढः कृतः ॥ अनेन साकं मनसा क्रीडनेच्छा तथा न मे ॥७१॥

इति श्रुत्वा समाक्रांतौ चिंतया पितरौ ततः ॥ अन्नदानमुपायं च विचेरतुरिति द्रुतम् ॥७२॥

तदारभ्य चक्रतुस्तौ पुराणोक्तविधानतः ॥ सुशीला पादयोश्चक्रे क्षालनं मुद्रिकान्विता ॥७३॥

जलधारां ददौ माता चंदनं पुत्रको हरेः ॥ हरिर्ददौ च ताबूलं बुभुजुस्तत्र मानवाः ॥७४॥

इति रीत्यान्नदानं तत्प्रवृत्तं भिक्षुसौख्यदम् ॥ तावुभौ प्रस्थितौ काश्यां प्राप्तौ काशीं सुखप्रदाम् ॥७५॥

" हे जननी ! ज्याने माझे पाणिग्रहण केले तो वर हा नसल्यामुळे हा माझा पती नव्हे . यास्तव याच्यासहवर्तमान क्रीडा करण्याविषयी माझ्या मनाची इच्छा होत नाही . " ॥७१॥

असे कन्येचे भाषण ऐकून तिचे मातापिता अत्यंत चिंताक्रांत झाले आणि त्यांनी आपल्या जावयाचा शोध लावण्यासाठी ब्राह्मणसंतर्पणनिमित्ताने अतिथिअभ्यागताला अन्नदान करणे हाच बेत योजला ॥७२॥

आणि त्या दिवसापासून सुशीलेचे मातापिता पुराणोक्त विधीने नित्य अन्नदान करु लागले . त्या सत्रात अशी व्यवस्था केली होती की , ती सुशीला आपल्या हातात ती मुद्रिका घालून अतिथीचे पादप्रक्षालन करीत असे ॥७३॥

आणि तिची माता वरुन उदक घालीत असते . हरीचा पुत्र गंध देत असे व हरी स्वतः ताबूल देत असते . अशी सुरेख व्यवस्था पाहून तेथे पुष्कळ अतिथी येऊन भोजन करुन जाऊ लागले . ॥७४॥

याप्रमाणे अतिथीला सौख्य देणारे अन्नदान सतत चालूच

राहिले . इकडे काशीयात्रेस निघालेले ते दोघे मामा - भाचे सुखरुपपणे काशीत येऊन पोहोचले . ॥७५॥

निर्मलांभसि गंगायाः स्नानं चक्रतुरादरात् ॥ स्वर्गद्वारं प्रस्थितौ तौ कुर्वंतौ धर्ममुत्तमम् ॥७६॥

पीतांबराणि ददतुर्भिक्षुकाणां गृहे गृहे ॥ आशिषश्च ददुस्तस्मै चिरंजीवो भवेदिति ॥७७॥

विश्वेश्वरं समायातौ नत्वा स्तुत्वा पुनःपुनः ॥ स्वयं गृहं प्रस्थितौ तौ शिवो मार्गेऽव द्रुतम ॥७८॥

शिव उवाच ॥ काये मे किंचिदस्वास्थ्यं मातुल प्रतिभाति हि ॥ ततः प्राणोत्क्रमे तस्य यमदूता उपस्थिताः ॥७९॥

मंगलागौरिका चापि तषां युद्धमभून्महत् ॥ जित्वा तान्मंगला प्राणान् ददौ तस्मैशिवाय च ॥८०॥

तेथे त्यांनी भागीरथीच्या निर्मल उदकात भक्तिपूर्वक स्नान केले आणि नंतर ते दोघे तेथून स्वर्गद्वाराच्या यात्रेला जाताना वाटेत उत्तम दानधर्म करीत चालले . ॥७६॥

ते असे की , घरोघरी भिक्षुकांना पीतांबर व वस्त्रे देत चालले . तेव्हा ते भिक्षुक ब्राह्मण शिवाला आशीर्वाद

देऊ लागले की , हा मुलगा चिरंजीव होईल . ॥७७॥

पुढे ती यात्रा करुन पुन्हा काशीत येऊन पुन्हः पुन्हा विश्वेश्वराला नमस्कार करुन त्यांनी त्याची स्तुती केली . याप्रमाणे यात्रा उरकून ते उभयता आपल्या घरी जाण्यासाठी निघाले ; तो मार्गात शिव एकाएकी म्हणाला - ॥७८॥

" मामा ! आज मला बैचेन वाटते . असे म्हणताच त्याचे प्राणोत्क्रमण झाले व तेथे यमदूतही हजर झाले . ॥७९॥

त्या वेळी मंगलागौरी त्याच्या संरक्षणार्थ तेथे आली , तेव्हा तिचे व यमदूतांचे मोठे भयंकर युद्ध झाले . त्या युद्धात मंगलागौरीने यमदूतांना जिंकून त्या शिवाला प्राणदान दिले . ॥८०॥

शिवोऽकस्मादुत्थितोऽसौ मातुलं प्रत्युवाच ह ॥ स्वन्पे युद्धं मया दृष्टं मंगलायमदूतयोः ॥८१॥

जितास्ते मंगलागौर्या ततोऽहं शयनच्युतः ॥ मातुल उवाच ॥ यज्जातं शिव तज्जातं न स्मर्तव्यं त्वया पुनः ॥८२॥

आवां गच्छाव नगरे पितरौ द्रष्टुमत्सुकौ ॥ प्रस्थितौ तौ

ततस्तस्मात् प्रतिष्ठापुरमापतुः ॥८३॥

रम्ये तडागे तत्रैतौ पाकारंभं प्रचक्रतुः ॥ दऽष्टौ तौ हरिदासीभिर्धैर्यौदार्यधरौ शुभौ ॥८४॥

दास्य ऊचुः ॥ अन्नदानं हरेर्गेहे प्रवृत्तं तत्र गम्यताम् ॥ उभावू चतुः ॥ भो दास्यो यात्रिकावावां गच्छावो न क्वचिद् गृहे ॥८५॥

नंतर शिव पडलेला होता तो एकाएकी उठला व मामाला म्हणाला की , " मी आज स्वप्नात मंगलागौरी व यमदूत यांचे भयंकर युद्ध पाहिले . ॥८१॥

त्यात मंगलागौरीने यमदूतांना जिंकले असे पाहून मी जागा झालो . " हे शिवाचे बोलणे ऐकून मामा म्हणाला - " हे शिवा ! जे झाले ते झाले . त्याची आठवण तू पुन्हा करु नको . ॥८२॥

आता आपण तुझ्या मातापितरांचे दर्शन करण्याविषयी उत्कंठित आहोत , म्हणून आपल्या नगरात जाऊ . " असे बोलून ते तेथून निघाले व पैठणला पुन्हा आले ॥८३॥

आणि तेथे पूर्वीच्या रमणीय सरोवरात ते दोघे राहून

स्वयंपाकास आरंभ करु लागले . त्यावेळी हरीच्या दासांनी ह्या दोघांना श्रेष्ठ धैर्य व औदार्य यांनी संपन्न असे पाहिले . ॥८४॥

तेव्हा त्यांना हरीच्या दासी म्हणतात की , " अहो पांथ हो ! येथून समीपच हरीच्या घरी अन्नसत्र चालले आहे , तेथे आपण चलावे . " ते ऐकून ते दोघे म्हणाले की , " दासी हो ! आम्ही वाटसरु आहोत . याकरिता आम्ही कोठेही कोणाच्या घरी जात नाही . " ॥८५॥

इति श्रुत्वा तयोर्वाक्यं दास्यो जग्मुः स्वकं गृहम् ॥
स्वस्वामिनिकटे वाक्यमवदन्सादरं तदा ॥८६॥

सर्वं दासीवचः श्रुत्वा तदर्थं प्रभुरादरात् ॥ प्रेषयामास
हस्त्यादिरत्नवस्त्राणि भूरिशः ॥८७॥

तददृष्टा विस्मितौ तावागच्छतुश्च हरेर्गृहम् ॥
हरिर्मातुलमभ्यर्च्य शिवं पूजितुमागतः ॥८८॥

क्षालयंती च सा कन्या चरणौ तस्य सत्रपा ॥ अभूद्वरो
मेऽयमिति जननी प्रत्युवाचह ॥८९॥

हरिः पप्रच्छ साश्चर्यं शीं मंगलदर्शनम् ॥ हरिरुवाच ॥
किंचिच्चिह्नं तवास्त्यत्र ब्रूहि मे वरदर्शन ॥९०॥

असे त्यांचे भाषण ऐकून दासी आपल्या घरी गेल्या आणि आपल्या धन्याजवळ मोठया आदराने ते वर्तमान सांगू लागल्या . ॥८६॥

त्याकाळी सर्व दासींचे ते भाषण ऐकून मोठया सत्काराने त्यास आणण्यासाठी त्या यजमानाने खूप हत्ती , अश्व इत्यादी वाहने आणि रत्ने , वस्त्रेही पाठविली . ॥८७॥

तेव्हा ते बहुत सन्मानाने आलेले बोलावणे पाहून ते प्रवासी आश्चर्यचकित होऊन तत्काल हरीच्या घरी आले . त्यावेळी हरी हा त्या उभयता प्रवाशांपैकी मातुलाची पूजा करुन त्याच्या शिव नामक भाच्याची पूजा करण्यासाठी आला . ॥८८॥

तेव्हा ती सत्रव्यवस्थापक हरीची कन्या त्या शिवाचे आपल्या हाताने पादप्रक्षालन करु लागली . त्यावेळी त्याला पाहताच ती लज्जित होऊन मातेला म्हणाली की , " आई ! हाच मी वरलेला पती आहे . " ॥८९॥

तेव्हा हरी आश्चर्याने त्या मंगलकारक दर्शनस्वरुप शिवाला विचारते की , " हे शिवा ! तू आमच्या मुलीचा पती असशील असे अनुमान वाटते ; पण अशाबद्दल

तुझ्यापाशी काही खूण आहे काय ? असेल तर सांग . "
॥९०॥

शिव उवाच ॥ ममेदं चिह्नमस्तीह इत्युक्त्वा गृहमागतः ॥
तत आनीय तत्पात्रं दर्शयामास सादरम् ॥९१॥

तत्पात्रं च हरिर्दृष्टा कन्यादानं चकार सः ॥ ददौ
रत्नानिवस्त्रानि सुवर्णानि बहून्यपि ॥९२॥

तामादाय प्रस्थितौ तौ ददतो बहुलं धनम् ॥ श्रावणे मासि
संप्राप्ते व्रतं भौमे चकार सा ॥९३॥

भुक्त्वा सर्वे प्रस्थितास्ते योजनं जग्मुरुत्तमाः ॥
सुशीलोवाच ॥ गौरीविसर्जनं चापि दीपमानं करोमि च
॥९४॥

ततो गंतव्यमस्माभिः पितरौ द्रष्टुमादरात् ॥ इत्युक्त्वा
आगतास्तत्र गौर्या आवाहनं कृतम् ॥९५॥

तेव्हा शिव म्हणाला की , " अल्पस्वल्प काही खूण आहे .
" असे बोलून तो आपल्या राहात्या घरी आला आणि
तेथे ठेवलेले सुवर्ण पात्र आणून मोठया आदराने
दाखविले . ॥९१॥

त्या वेळी ते पात्र पाहून हरीने ती सुशीला कन्या त्याच्या

स्वाधीन केली आणि बहुत रत्ने , वस्त्रे , सुवर्ण त्या जावयाला दिले . ॥९२॥

तेव्हा त्या कन्येला घेऊन ते दोघेही तेथून निघाले व निघताना ब्राह्मणांना खूप द्रव्य वाटले . नंतर मार्गात श्रावणमास प्राप्त झाला असता त्या सुशीलेने मंगळवारी मंगलागौरीचे व्रत केले ॥९३॥

आणि उत्तम भोजन करुन ते सर्व तेथून निघून चार कोसपर्यंत पुढे गेले . तेव्हा सुशीला म्हणाली की , " मंगलागौरीला आरती करुन तिचे विसर्जन करीन ॥९४॥

आणि नंतर आपण मातापितरांस आदरपूर्वक भेटण्यासाठी जाऊ . " असे तिने बोलताच जेथे गौरीचे आवाहन केले होते , त्या जागी ते आले ॥९५॥

ददृशुस्तत्र सौवर्णं देवालयमनुत्तमम् ॥ गौरीविसर्जनं दीपमानं सा च व्यचीकरत् ॥९६॥

ततः सर्वे प्रस्थितास्ते पितरौ द्रष्टुमुत्सुकाः ॥ कुंडिनासन्नदेशे तान् दृष्टा विस्मयिनो जनाः ॥९७॥

अब्रुवंस्ते धर्मपालं सोत्कंठं प्रियदर्शनाः ॥ जना ऊचुः ॥ धर्मपालाद्य ते पुत्रः सभार्यः शालकस्तथा ॥९८॥

समायातो वयं दृष्टा अधुनैव समागतः ॥ यावज्जना वदंत्यत्र तावत्सोऽपि समागतः ॥९९॥

नमस्कारांश्चकारासौ पितृभ्यां पितृवल्लभः ॥ मातुलोऽपि नतिं चक्रे भगिनीधर्मपालयोः ॥१००॥

तो त्यांनी गौरीपूजनस्थळी सुवर्णाचे उत्तम देवालय पाहिले . नंतर त्या सुशीलेने देवीला आरती करुन तिचे विसर्जन केले . ॥९६॥

नंतर ते सर्व मातापितरांस भेटण्यासाठी मोठया उत्कंठेने तेथून निघाले . ते कुंडिन नगराजवळ येताच त्यांना पाहून तेथील तेथील लोक विस्मित होऊन ॥९७॥

प्रियदर्शनाच्या योगाने उत्सुक झालेले धर्मपालाजवळ बोलू लागले की , " हे धर्मपाल ! तुझा पुत्र भार्येसह आणि मेहुणा हे तिघेही आज ॥९८॥

नगरासमीप आले . कशावरुन म्हणशील तर आम्ही त्यांस आताच पाहून आलो . " असे लोक जो बोलत आहेत एवढयात , तेही तेथे आले ॥९९॥

आणि त्या पितृभक्त पुत्राने मातापितरांस अनेक नमस्कार केले . तसाच त्याच्या मातुलानेही भगिनी व

धर्मपाल यांस नमस्कार केला ॥१००॥

सुशीला श्वशुरायापि श्वश्रूं नत्वा स्थिता तदा ॥ श्वश्रुरुवाच ॥ सुशीले तद्व्रतं ब्रूहि यद्व्रतस्य प्रभावतः ॥ आयुर्वृद्धिः शिशोर्मेऽपि जाता कमललोचने ॥१०॥

सुशीलोवाच ॥ न जानेऽहं व्रतं श्वश्रु जाने मानवती हरिं ॥ श्वशुरं धर्मपालं च श्वश्रूं च भवती तथा ॥१०२॥

मंगलादेवता जाने वरं तु युवयोः सुतम् ॥ इत्युक्त्वा च सुशीला सा बुभुजे स्वांतहर्षिता ॥१०३॥

कृष्ण उवाच ॥ तस्माद्व्रतमिदं धर्म स्त्रीभिः कार्यं सदैव तु ॥ युधिष्ठिर उवाच ॥ फलमस्यं श्रुतं कृष्ण विधानं ब्रूहि केशव ॥१०४॥

श्रीकृष्ण उवाच ॥ श्रावणे मासि भौमेषु चतुर्षु व्रतमाचरेत् ॥ प्रातरुत्थाय सुस्नाता संकल्प्य व्रतमुत्तमम्
॥१०५॥

उपचारैः षोडशभिः पूजयेन्मंगलां तथा ॥ नीराजनं ततः कुर्याव्द्दीपैः षोडश संख्यया ॥१०६॥

मात्रे सुवासिनीभ्यश्च देयं वायनमुत्तमम् ॥ भोक्तव्या दीपकाश्चापि अन्नं लवणवर्जितम् ॥१०७॥

विसर्जनं मंगलाया दीपमानं ततः क्रमात् ॥
पंचसंवत्सरेष्वेवं कर्तव्यं पतिमिच्छुभिः ॥१०८॥

॥ इति श्रीभविष्योत्तरपुराणे मंगलागौरीव्रतोद्यापनकथा संपूर्णा ॥

तशीच सुशीलाही सासूसासर्यांस नमस्कार करुन जवळ उभी राहिली . तेव्हा सासू म्हणाली - " हे कमलनयने सुशीले ! ज्या व्रताच्या प्रतापाने माझ्या पुत्राची आयुष्यवृद्धी झाली , ते व्रत मला सांग . " ॥१०१॥

सुशीला म्हणाली - " अहो सासूबाई ! मी व्रत जाणत नाही , तर केवळ मानवती व हरी या मातापितरांना जाणते . श्वशुर धर्मपाल व आपण सासूबाई ॥१०२॥

तशीच मंगलागौरी आणि तुमचा पुत्र व माझा पती यांना मात्र मी जाणते . याहून दुसरे काहीच जाणत नाही . " असे बोलून ती सुशीला अंतःकरणात हर्षयुक्त होऊन भोजन करिती झाली . ॥१०३॥

श्रीकृष्ण म्हणतात - " हे धर्मा ! हे असे मंगलागौरीचे व्रत अवैधव्यकारक आहे म्हणून स्त्रियांनी सर्वदा करावे . " युधिष्ठिर विचारतो - " हे कृष्णा ! या व्रताचे फल श्रवण

केल . हे केशवा ! आता याचे विधान सांगा " ॥१०४॥

तेव्हा कृष्ण सांगतात - " श्रावणमासी चारही मंगळवारी हे व्रत करावे . ते असे की , स्त्रियांनी प्रातःकाळी उठून मंगलस्नानपूर्वक या उत्तम व्रताचा संकल्प करावा ॥१०५॥

व षोडाशोपचारांनी मंगलागौरीचे पूजन करावे . तसेच सोळा दीपांनी निरांजन ( आरती ) करावी ॥१०६॥

नंतर माता व इतर सुवासिनी यांस उत्तम वायन द्या , आणि नीरांजनाकरिता केलेले पिठाचे दीप व अळणी अन्न वगैरे भक्षण करावे . ॥१०७॥

नंतर दुसर्या दिवशी प्रातःकाळी मंगलागौरीला आरती करुन तिचे विसर्जन करावे . अशा क्रमाने व्रत करावे . असे हे व्रत आपल्या पतीला पूर्ण आयुष्य प्राप्त होण्याची इच्छा करणार्या स्त्रियांनी लग्नापासून पाच वर्षे करावे . " ॥१०८॥

इति श्रीभविष्योत्तरपुराणे मंगलागौरीव्रतसार्थकथा समाप्तः ॥

------------------------------------

## मंगळागौरीची आरती १

चल चल सखे पुजना ।

हस्ताशी जोडोनी, गौरीसी वंदुनि ॥ धृ. ॥

प्रथम वाहू हळदी कुंकुम हे ।

हाती घेऊ पुष्प सुगंधी हे ।

वाहुनी अक्षदा लावूनी कर्पूरा ॥ १ ॥

चांदीच्या ताटात लावा आरतीला ।

ओवाळू पंचारति तिजला ।

वर्षाशी येऊनी दर्शन देऊनी सर्वकरी मंगला ॥ २ ॥

सौभाग्य लाभो सदा सर्वदा ।

लयास जावो सर्वही आपदा ।

गाऊनी हे गान मागू चुडेदान ॥ ३ ॥

निरांजने आता लावा तुम्ही ।

एकाग्र मनासी ठेवा जणी ।

लावून कर्पूर दावूनी नैवद्य ॥ ४ ॥

--------------------------------

## मंगळागौरीची आरती २

जय देवी मंगळागौरी ।

सुवासिन मी तुला पुजिते ॥ धृ. ॥

कुंकुमतिलक माझ्या लल्लाटी ।

मंगलमणी दे शोभत कंठी ॥

रत्नपाचुचा चुडा मनगटी ।

स्त्रीजन्माचे अहेव लेणे ॥

तुझ्या कृपेने मला लाभले ॥ १ ॥

शिवशंकराहूनी प्रेमळ भोळा ।

दिधलासी पति तू भाग्यवतीला ॥

देहाच्या देवारी पुजीन त्याला ।

ह्रदयाची आरती प्राणांच्या ज्योती ॥

अमृत तेजाळ प्रित जळते ॥ २ ॥

------------------------------------

## मंगळागौरीची आरती ३

मागू शाश्वत सौभाग्याप्रति गौरीला ।

उजळू पंचारती तुजला ॥ धृ. ॥

जमू सगळ्याजणी एक स्थळी ।

सात्विक वृत्ती आणुनी चित्ती ।

आसन करु स्थित, मागू ॥ १ ॥

श्रावण मंगळवारी हिला ।

घालू स्नाने भरजरी वस्त्रे ।

कंचुक मौतिक मागू ॥ २ ॥

नेत्री अंजन घालू आधी कंठी भूषण हाती कंकण ।

नासी नथ मग, मागू ॥ ३ ॥

पंचामृती ते पुजन करु ।

कुंकुम अबिरा शेंदुर बुक्का ।

वाहू अक्षता, मागू ॥ ४ ॥

षोडस परीची पत्री आणू ।

खाज्या करंज्या जिलब्या ताज्या ।

नैवद्याप्रती, मागू ॥ ५ ॥

जन्मांतरीचे दु:ख हरी ।

जाऊ शरणा दृढ धरी चरणा ॥

कृष्णे समवेत, मागू ॥ ६ ॥

------------------------------

## मंगळागौरीची आरती ४

ओवाळू आरतीला मंगळागौरी तुजला ।

सौभाग्या देई आम्हा हिच विनंती तुला ॥ धृ. ॥

श्रावण मंगळवारी जमु सगळ्या आम्ही नारी ॥

अर्पूवसन जरतारी तुजला बहुत प्रकारी ।

माला या सुमनांच्या अर्पूनी पुजनाला ॥ १ ॥

षोडस परीची पत्री ठेवुनी या सत्पात्री ।

आनंदे आम्ही युवती वाहू तुज अति प्रिती ।

स्विकारी पुजेला वंदीत तव चरणा ॥ २ ॥

वंदन करितो तुजला भक्तीने आम्ही बाला ।

दावीन सन्मार्गाला यास्तव नमू चरणाला ।

अज्ञानी आम्ही बाला तारिया सकला ॥ ३ ॥

प्रार्थी सुशी तभया ही चीर सौभाग्या देई ।

मागत नच तव काहीं ह्यावीण अंबाबाई प्रेमाने परिसावे हिच विनंती तुला ॥ ४ ॥

---------------------------------------

अशोककाका कुलकर्णी

पाचेगावकर

९०९६३४२४५१